**“महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम (MSI-CDP)” अंतर्गत ॲग्रीकल्चर इंम्प्लेमेंट क्लस्टर, जाफ्राबाद जि. जालना या उद्योग समूह प्रकल्पाच्या सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी अंतिम टप्प्याचे अनुदान मंजूर करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**

**शासन निर्णय क्र. क्लस्टर-२०२०/ प्र.क्र.१७५/ उद्योग-७,**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक ०५ जानेवारी, २०२२

वाचा :- १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. एसएमई-२०१३/ प्र.क्र.२०७/ उद्योग-७, दिनांक २५/०२/२०१४.

२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. क्लस्टर-२०२०/ प्र.क्र.१७५/ उद्योग-७, दिनांक १५/१०/२०२०.

३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. क्लस्टर-२०२०/ प्र.क्र.१७५/ उद्योग-७, दिनांक २६/०३/२०२१.

४) उद्योग संचालनालयाचे पत्र क्र. उसं/औसशा/एमएसआयसीडीपी/CFC/अनुदान वितरण/ २०२१/ अे-९३३, दिनांक १४/१०/२०२१.

प्रस्तावना :-

राज्यातील औद्योगिकदृष्ट्या अविकसित क्षेत्रातील छोट्या समूहांचा, समूह विकास होऊन त्याद्वारे सूक्ष्म व लघू घटकांच्या सर्वांगीण विकासास चालना मिळणेसाठी “महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम (MSI-CDP)” ही योजना दिनांक २५/०२/२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आलेली आहे. सदर योजनेंतर्गत सूक्ष्म व लघू उपक्रमाच्या सर्वांगीण विकास व वाढीकरीता क्षमतावृध्दी कार्यक्रम अंमलबजावणीसाठी तसेच सामायिक सुविधा उभारणीसाठी राज्य शासनाचे अनुदान देण्यात येते. या योजनेंतर्गत औद्योगिक समूहाच्या उत्पादन प्रक्रियेमधील त्रृटी, कमतरता यांचे योग्य निदान करून अद्यावत तंत्रज्ञान, बाजारपेठ विस्तारीकरण, विविध यशस्वी औद्योगिक समूहांना भेटी, अद्यावत प्रशिक्षण कार्यक्रम व अभ्यास दौरे इ. चा समावेश असलेला निदानोपयोगी अभ्यास अहवाल (DSR) तयार करण्यात येतो. सदर निदानोपयोगी अभ्यास अहवाल जिल्हास्तरीय समितीच्या शिफारशीनंतर प्राप्त झाल्यानंतर राज्यस्तरीय औद्योगिक समूह संनियंत्रण समितीमार्फत निदानोपयोगी अभ्यास अहवाल प्रस्तावांस मंजूरी देणे व त्या अंतर्गत क्षमतावृध्दी कार्यक्रमास अनुदान निश्चिती करणे इ. बाबी केल्या जातात. तसेच सूक्ष्म व लघू उद्योग घटकांची उत्पादकता व स्पर्धात्मकता वाढविणेसाठी उच्च दर्जाच्या सामायिक सुविधा व इतर आवश्यक परवाने, ना-हरकत दाखले, तांत्रिक व आर्थिक मुल्यांकन अहवाल यांचा समावेश असलेला सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) तयार करण्यात येतो. राज्यस्तरीय सुकाणू समितीद्वारे सामायिक सुविधा केंद्राच्या प्रस्तावास अंतिम मंजूरी मिळाल्यानंतर खरेदी प्रक्रिया सुरु करण्यात येते. मंजूरीप्रमाणे यंत्रसामग्री, उपकरणे, कार्यस्थळावर सुस्थापित झाल्याबाबतचा भौतिक पडताळणी अहवाल प्राप्त झाल्यानंतर प्रथम टप्प्यातील ६०% अनुदान वितरीत केले जाते. उर्वरित ४०% अनुदान हे सामायिक सुविधा केंद्र यशस्वीपणे पूर्ण झाल्याबाबतचे प्रमाणपत्र उद्योग सह संचालक यांच्याकडून प्राप्त झाल्यानंतर वितरीत करण्यात येते. त्यानुसार ॲग्रीकल्चर इंम्प्लेमेंट

क्लस्टर, जाफ्राबाद जि. जालना समूह प्रकल्पास सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी मान्यता दिलेली असून प्रकल्प मंजूरीप्रमाणे सामायिक सुविधा केंद्र यशस्वीपणे पूर्ण झाल्याबाबतचे प्रमाणपत्र उद्योग सह संचालक, औरंगाबाद यांनी उद्योग संचालनालयामार्फत सादर केले आहे. त्याअनुषंगाने सदर प्रकल्पाच्या सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी राज्य शासनाच्या हिश्श्यातील अंतिम टप्प्यातील अनुदान रुपये १,४३,९२,८००/-वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

राज्य शासनाच्या "महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम (MSI-CDP)" या योजनेंतर्गत मंजूरीप्राप्त ॲग्रीकल्चर इंम्प्लेमेंट क्लस्टर, जाफ्राबाद जि. जालना प्रकल्पाच्या सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी राज्य शासनाचे अंतिम टप्प्यातील अनुदान रुपये १,४३,९२,८००/- वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव उद्योग संचालनालयाने उपरोक्त संदर्भ क्र. ४ येथील पत्रान्वये सादर केलेला आहे. त्यानुषंगाने प्रस्तुत योजनेतील तरतूदीनुसार शासनाचे अंतिम टप्प्यातील रुपये १,४३,९२,८००/- (अक्षरी रुपये एक कोटी त्रेचाळीस लाख ब्याण्णव हजार आठशे फक्त) इतके अनुदान वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांनी रुपये १,४३,९२,८००/- (अक्षरी रुपये एक कोटी त्रेचाळीस लाख ब्याण्णव हजार आठशे फक्त) ही रक्कम शासकीय कोषागारातून काढून ॲग्रीकल्चर इंम्प्लेमेंट क्लस्टर, जाफ्राबाद जि. जालना समूह प्रकल्पास देण्याची व्यवस्था करावी. उपरोक्त नमूद रुपये १,४३,९२,८००/- (अक्षरी रुपये एक कोटी त्रेचाळीस लाख ब्याण्णव हजार आठशे फक्त) ही रक्कम आहरण व संवितरण करावयाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात येत आहेत.

३. वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४/०६/२०२१ व त्यासोबतचे परिशिष्ठामध्ये नमूद तरतूदीनुसार असे प्रमाणित करण्यात येते की, "महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम" या योजनेचा शासन निर्णय दिनांक २५/०२/२०१४ रोजी निगर्मित केला असून यामध्ये योजनेचा कालावधी, अंमलबजावणी यंत्रणा, अनुदान वितरण, विविध मंजूरीस्तव समिती यांची माहिती दिलेली आहे. तसेच सदर प्रकल्पाच्या अनुषंगाने यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र उद्योग संचालनालयाकडे उपलब्ध करुन दिलेले आहे व यापूर्वी सदर प्रस्तावांतर्गत लेखापरिक्षकांकडून कोणतेही मुद्दे उपस्थित करण्यात आलेले नाहीत असे उद्योग संचालनालय यांनी कळविले आहे. त्यामुळे या अटींची पूर्तता होत आहे. तर सदर योजना वैयक्तिक लाभार्थ्यांची नाही, बांधकाम विषयक प्रस्ताव नाही, त्यामुळे या व इतर अटी लागू होत नाहीत.

४. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांनी सदर समूह प्रकल्पाच्या प्रगतीवर व दिलेल्या शासकीय भागभांडवलाच्या सुयोग्य वापरावर व विनियोगावर देखरेख ठेवण्याची आवश्यक ती कार्यवाही करावी.

५. सदर योजनेसाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक के-७, २८५१-ग्रामोद्योग व लघु उद्योग, ०० १०२ लघुउद्योग-राज्य योजनांतर्गत योजना (००) (२४) महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम (MSI-CDP) (२८५१ ६३७८) ३३ अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय, वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४/०६/२०२१, दिनांक २९/०७/२०२१, दिनांक १४/१०/२०२१ व त्यासोबतचे परिशिष्ठामध्ये नमूद तरतूदीनुसार, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१४३/१४६१, दिनांक २९/११/२०२१ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२७४/२०२१/व्यय-१६, दिनांक २३/१२/२०२१ अन्वये मिळालेल्या सहमतीच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्र. २०२२०१०५१२४१४००७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJEEV VITTHAL RAJMANE

Digitally signed by RAJEEV VITTHAL RAJMANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=236eb645736d99439ecdba7a9ca089f1295797136f40d4172ad8740745981e39, pseudonym=5986A7EF7C4A5144BE154D090DDF15619B0872E6, serialNumber=9AF1A1281C6D8847D249FEF2488B7CAA84A3751E6EE91EBAA5CC0332D8B30060, cn=RAJEEV VITTHAL RAJMANE
Date: 2022.02.01 15:08:07 +05'30'

**(राजीव राजमाने)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई-३२. (पाच प्रती)
२) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
५) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.
६) उद्योग सह संचालक, औरंगाबाद विभाग. (उद्योग संचालनालयामार्फत)
७) महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, जालना. (उद्योग संचालनालयामार्फत)
८) ॲग्रीकल्चर इंम्प्लेमेंट क्लस्टर, जाफ्राबाद, जि.जालना. (उद्योग संचालनालयामार्फत)
९) नियोजन विभाग (का.१४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
१०) वित्त विभाग (व्यय-१६), मंत्रालय, मुंबई-३२.
११) अवर सचिव (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) निवडनस्ती (उद्योग-७), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.